**राज्यातील शासकीय व निमशासकीय जमिनीवरील अतिक्रमणे रोखणे आणि खुल्या व मोकळया जागांचे नियमित लेखा परिक्षण (Land Audit) करणेबाबत मा. मुख्यसचिवांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय समिती .**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय : उच्चस्त २०१०/ प्र.क्र. ६५/झोपसू-१,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक : १० ऑगस्ट, २०१०**

**प्रस्तावना :**

राज्याच्या शहरीभागातील वाढत्या औद्योगिकरणामुळे तसेच मोठया प्रमाणांत रोजगारांच्या संधी उपलब्ध झाल्यामुळे शहरी भागात लोकांचे लोंढे येत असतात. घरांच्या न परवडणा-या किंमतीमुळे आणि घरांच्या अपु-या पुरवठयामुळे गरीब व्यक्ती घर विकत घेऊ शकत नाही. त्यामुळे देशाच्या कानाकोप-यातून राज्यातील शहरी भागात लोक मिळेल त्या मोकळया जागेवर झोपडया बांधून अतिक्रमणे करताना दिसतात. अशा प्रकारे राज्य शासन, राज्य शासनाचे उपक्रम, महामंडळे, प्राधिकरणे, महानगर पालिका, नगरपालिका, केंद्र शासनाच्या जमिनी इत्यादीवर मोठया प्रमाणात बेकायदेशीर अतिक्रमणे होत आहेत. झोपडपट्टया वाढत आहेत.

२. राज्य शासनाच्या झोपडपट्टी विषयक प्रचलित धोरणानुसार दिनांक १.१.१९९५ पूर्वी पासून अस्तित्वात असलेल्या झोपडीतील झोपडीधारकाचे त्याच झोपडीत सततचे वास्तव्य असल्यास अशा झोपडीधारकाला ओळखपत्र देऊन त्याचा निवारा संरक्षित करण्यात येतो . तसेच दि. १.१.१९९५ नंतर झालेली अतिक्रमणे निष्कासित करण्याबाबतचे धोरण असून त्याअनुषंगाने महाराष्ट्र झोपडपट्टी ( सुधारणा, निर्मूलन व पुनर्विकास) अधिनियम, १९७१ मध्ये दुरुस्ती करण्यात आलेली आहे. तथापी, शासकीय / निमशासकीय तसेच खाजगी मालकीच्या जमिनीवरमोठया प्रमाणावर अतिक्रमणे वाढली आहेत. काही प्रमाणात अशी अतिक्रमणे वेळोवेळी निष्कासित करण्यात आली. तथापि लोकप्रतिनिधी तसेच झोपडपट्टीवासियांकडून १.१.१९९५ नंतरच्या झोपडपट्टीवासियांना संरक्षण देण्याबाबत सातत्याने मागणी होऊ लागल्याने या कामास म्हणावे तसे महत्व मिळाले नाही. मुंबईत येणा-या कामगार वर्गाकरिता निवारा देण्याबाबत एक ठोस धोरण निश्चित करण्यासाठी एका उच्चस्तरीय समितीचे गठन करावे, असे मा. उच्च न्यायालयाने याचिका क्र. ९८/१९९९, रिलीफ रोड हाऊसिंग सोसायटी असोसिएशनच्या प्रकरणात दिलेल्या निर्णयानुसार शासनाने या

संबंधात शिफारशी करण्यासाठी दि. २५.१०.२००५ च्या शासन निर्णयान्वये मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली एक उच्च स्तरीय समिती गठीत केली आहे.

३. महसूल व वन विभाग, नगर विकास विभाग आणि गृहनिर्माण विभागामार्फत शासकीय, निमशासकीय किंवा खाजगी जमिनीवरील अनधिकृत झोपडपट्ट्या किंवा अन्य अनधिकृत बांधकामे तोडण्यासंदर्भात वेळोवेळी आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. शासनाच्या या तिन्ही विभागाकडून निर्गमित झालेले आदेश वेगवेगळया रितीने तसेच वेगवेगळया क्षेत्रासाठी लागू करण्यात आले आहेत. या सर्व आदेश / शासन निर्णयामध्ये एकसूत्रीपणा असावा यासाठी राज्यातील शासकीय / निमशासकीय जमिनीवरील अतिक्रमणाबाबत धोरण तयार करण्यासाठी आणि बेकायदेशीर अनधिकृत बांधकामांना प्रतिबंध करण्यासाठी सक्षम यंत्रणा उभी करुन भविष्यात ही समस्या निर्माण होणार नाही याची दक्षता घेण्याबाबत शिफारशी करण्यासाठी तसेच राज्यातील सर्व मोकळया जागा भुखंड, मैदाने, पदपाथ यांचे नियमित भू-लेखापरिक्षण ( Land Audit ) करण्याची यंत्रणा निर्माण करण्यासाठी मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली उच्च स्तरीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

राज्यातील शासकीय / निमशासकीय जमिनीवरील अतिक्रमणाबाबत धोरण तयार करण्यासाठी आणि बेकायदेशीर व अनधिकृत बांधकामांना प्रतिबंध करण्यासंबंधी शिफारस करण्यासाठी राज्यातील सर्व मोकळया जागा भुखंड, मैदाने, पदपाथ यांचे नियमित भू-लेखापरिक्षण ( Land Audit ) करण्याची यंत्रणा निर्माण करुन वार्षिक अहवाल शासनास सादर करण्याबाबत खालील प्रमाणे उच्चस्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे :

| | | | |
|---|---|---|---|
| १. | मुख्य सचिव | : | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव ( गृह विभाग ) | : | सदस्य |
| ३. | अपर मुख्य सचिव ( महसुल विभाग ) | : | सदस्य |
| ४. | प्रधान सचिव, नगर विकास विभाग | : | सदस्य |
| ५. | आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका | : | सदस्य |
| ६. | उपाध्यक्ष, म्हाडा | : | सदस्य |
| ७. | महानगर आयुक्त, एम.एम.आर.डी.ए. | : | सदस्य |
| ८. | सचिव, गृहनिर्माण विभाग | : | सदस्य सचिव |
| ९. | सचिव, ग्राम विकास विभाग | | सदस्य |
| १० | मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण | : | सदस्य |
| ११. | विभागीय आयुक्त ( सर्व) | : | सदस्य |

**समितीची कार्यकक्षा :-**

अ) सदर समितीने दर तीन महिन्यात बैठक घेऊन राज्यातील शासकीय, निमशासकीय, म्हाडा, बृहन्मुंबई महानगरपालिका, एम.एम.आर.डी.ए., नगर पालिका इतर शासकीय संस्था, जिल्हा परिषदा इत्यादींच्या जमिनीवरील अतिक्रमणाबाबत आढावा घ्यावा व अतिक्रमणे होणार नाहीत याबाबत कार्यवाही करावी.

ब) उपरोक्त सर्व जमिनींचे भू लेखापरिक्षण दरवर्षी करण्यात यावे. त्यांच्या अहवालांचे विश्लेषण, नियमन उच्चस्तरीय समिती करेल.

क) मोकळया जमीनींचे भूसर्वेक्षण व भू.लेखापरिक्षण करण्यासाठी अद्ययावत तंत्रज्ञानाचा वापर करावा, जसे की, उपग्रहाद्वारे छायाचित्रण ( remote sensing satellite imagery) ( G.I.S., M.I.S. इ.)

ड) तसेच मोकळया जागांचा जास्तीत-जास्त परिणामकारक वापर कसा करता येईल याबाबतही समिती मार्गदर्शक सुचना तयार करेल.

इ) मोकळया जागा संरक्षित करणेबाबत उपाय योजना समिती सुचवेल.

फ) अतिक्रमणास आळा घालण्यास जबाबदार असलेल्या सबंधित अधिकारी / कर्मचारी यांचे विरुध्द प्रचलित नियम / कायद्यांप्रमाणे कार्यवाही प्रस्तावित करणेची शिफारस सदर समिती करेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( दिलीप शिंदे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. राज्यमंत्री ( गृहनिर्माण )यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा. राज्यमंत्री ( नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा. राज्यमंत्री ( महसूल ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
११. मा. महाअधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई

१२. मा. अपर मुख्य सचिव ( नगर विकास) मंत्रालय, मुंबई
१३. मा. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. मा. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. मा. आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण वांद्रे, मुंबई
१६. सचिव, ( ग्राम विकास विभाग), मंत्रालय, मुंबई ३२
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई- ५१.
१८. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व) मुंबई
१९. जिल्हाधिकारी, मुंबई शहर , जुने जकात घर, मुंबई
२०. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, वांद्रे, मुंबई
२१. अपर जिल्हाधिकारी ( अति व निष्कासन ) पश्चिम उपनगरे, नविन प्रशासकीय भवन, सरकारी वसाहत, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
२२. अपर जिल्हाधिकारी (अति व निष्कासन ) पूर्व उपनगरे, चर्चगेट स्टेशन समोर, चर्चगेट, मुंबई
२३. सर्व विभागीय आयुक्त
२४. या विभागातील सर्व कार्यासने
२५. निवड नस्ती ( झोपसू-१) गृहनिर्माण विभाग